**मागणी क्र. सी-०७ २४०६- वनीकरण व वन्यजीवन, १०१, वन संरक्षण, विकास व पुनर्निमिती (०१) प्रशासन व संरक्षण (०१) (०२) वनांचे सर्वेक्षण, जमाबंदी व सिमांकन (२४०६ ०१०२) (अनिवार्य) या योजनेतील "०२- मजूरी" या उद्दीष्टामधील बचत होणारा रक्कम रु.४.०० कोटी एवढा अर्थसंकल्पीत निधी शासकीय अभिकरणाकडून समुपयोजन (बांबू) (२४०६ ०४९९) (अनिवार्य) या योजनेतील "०२- मजूरी" या उद्दीष्टामध्ये पुनर्विनियोजनाव्दारे उपलब्ध करुन देणेबाबत.**

महाराष्ट्र शासन

**महसूल व वन विभाग,**

**शासन आदेश क्रमांक : एफडीएम-२०२४/प्र.क्र.२९/फ-२**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक :- ३१ मार्च, २०२४.

**वाचा** : १) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-२(१)/असं/प्र.क्र.०१(भाग-३)/६६६/२०२३-२४,दि.२१.०३.२०२४.

२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३, दि.०५.०२.२०२४ व दि.०४.०३.२०२४.

**प्रस्तावना :-**

सन २०२३-२४ करीता मुख्य लेखाशिर्ष मागणी क्र. सी-०७-२४०६- शासकीय अभिकरणाकडून समुपयोजन (बांबू) २४०६०४९९ (अनिवार्य) या योजनेतील अर्थसंकल्पित करण्यात आलेला निधी अपुरा पडत आहे.

प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी त्यांच्या क्र.१ येथील पत्रान्वये मागणी क्र. सी-०७ २४०६- वनीकरण व वन्यजीवन, १०१, वन संरक्षण, विकास व पुनर्निमिती (०१) प्रशासन व संरक्षण (०१) (०२) वनांचे सर्वेक्षण, जमाबंदी व सिमांकन (२४०६ ०१०२) (अनिवार्य) या योजनेतील "०२- मजूरी" या उद्दीष्टामधील बचत होणारा रक्कम रु.४.०० कोटी एवढा अर्थसंकल्पीत निधी मुख्य लेखाशिर्ष मागणी क्र. सी- ०७-२४०६ वनीकरण व वन्यजीवन, १०५, वनोत्पादन (०१) शासकीय अभिकरणाकडून समुपयोजन (०१) (०५) शासकीय अभिकरणाकडून समुपयोजन (बांबू) (२४०६ ०४९९) (अनिवार्य) या योजनेतील "०२- मजूरी" या उद्दीष्टामध्ये पुनर्विनियोजनाव्दारे निधी उपलब्ध करून देणेबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

त्या अनुषंगाने मुख्य लेखाशिर्ष मागणी क्र. सी-०७ २४०६- वनीकरण व वन्यजीवन, वनांचे सर्वेक्षण, जमाबंदी व सिमांकन (२४०६ ०१०२) (अनिवार्य) या योजनेतील **"०२- मजूरी"** या उद्दीष्टामधील अर्थसंकल्पीत निधीपैकी **रु.४.०० कोटीची** बचत होत असून मागणी क्र. सी- ०७-

२४०६ वनीकरण व वन्यजीवन, शासकीय अभिकरणाकडून समुपयोजन (बांबू) (२४०६ ०४९९) (अनिवार्य) या योजनेतील **"०२- मजूरी"** या उद्दीष्टातंर्गत करावयाच्या कामांकरिता जसे चंद्रपूर, गडचिरोली, नागपूर व अमरावती वनवृत्ताअंतर्गत तसेच ताडोबा-अंधरी व्याघ्र प्रकल्प व इतर वनवृत्ता अंतर्गत बांबू निष्कासनाची कामे तसेच बांबू फुलोरा (Gregarious Flowering) व्यवस्थापन कामे पूर्ण करण्याकरिता पुनर्विनियोजनाव्दारे निधी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश :-**

प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचा प्रस्ताव तसेच वित्त विभागाने संदर्भ क्र.२ येथील परिपत्रकांन्वये दिलेल्या सूचना विचारात घेता, सन २०२३-२४ या वर्षाकरीता मागणी क्र. सी-०७ अंतर्गत मुख्य लेखाशीर्ष २४०६- वनीकरण व वन्यजीवन, वनांचे सर्वेक्षण, जमाबंदी व सिमांकन (२४०६ ०१०२) (अनिवार्य) या योजनेतील **"०२- मजूरी"** या उद्दीष्टामधील रु.४.०० कोटी इतका निधी मागणी क्र. सी- ०७-२४०६ वनीकरण व वन्यजीवन, शासकीय अभिकरणाकडून समुपयोजन (बांबू) (२४०६ ०४९९) (अनिवार्य) या योजनेतील **"०२- मजूरी"** या उद्दीष्टातंर्गत पुढील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे पुनर्विनियोजनाव्दारे उपलब्ध करण्यास व बीम्स् (BEAMS) प्रणालीवर उपलब्ध केलेल्या अनुदानाच्या मर्यादेत खर्च करण्यास या शासन आदेशान्वये मान्यता देण्यात येत आहे :-

**(रक्कम लाखात)**

| ज्या लेखाशिर्षातून व योजनेतून पुनर्विनियोजन करावयाचे आहे त्याचा तपशील | | | | ज्या लेखाशिर्षात व योजनेत पुनर्विनियोजन करावयाचे आहे त्याचा तपशील | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| लेखाशिर्ष व योजना | सविस्तर शीर्ष | सुधारीत अंदाजानुसार तरतूद | पुनर्विनियोजन करावयाचा निधी | लेखाशिर्षा व योजना | सविस्तर शीर्ष | सुधारीत अंदाजानुसार तरतूद | पुनर्विनियोजनाने प्राप्त होणारा निधी | पुनर्विनियोजन नंतर उपलब्ध होणारा निधी |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| २४०६ ०१०२ वनांचे सर्वेक्षण, जमाबंदी व सिमांकन (अनिवार्य) | **०२ मजूरी** | ११११.५० | **४००.००** | २४०६ ०४९९ **शासकीय अभिकरणाकडून समुपयोजन** (बांबू) (अनिवार्य) | **०२ मजूरी** | ७७५.०० | **४००.००** | ११७५.०० |

२. पुनर्विनियोजनाने उपलब्ध करुन दिलेला निधी ज्या प्रयोजनासाठी वर्ग करण्यात आला आहे. त्याच प्रयोजनासाठी त्याचा वापर होत आहे, याची खातरजमा प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी करावी. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीच्या मर्यादेपेक्षा जास्त खर्च होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

३. सदर शासन आदेश, वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. १६३/व्यय-१०, दि.२८.०३.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार तसेच वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-३, अनु. क्र.३, परिच्छेद १६६ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३३११३२०२६४२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

BHAGWAN MARUTI SAWANT

Digitally signed by BHAGWAN MARUTI SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=8ee89eb0aec64f8bc0bdf8d85ddb4706d35abd8b73c618e114ee98d5c9ecf57b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C7DBA1C6B5F7AB2A6CABC4F7EAD8CFA74F8F7A0FADCAC76D8F1CF22569F16BD3, cn=BHAGWAN MARUTI SAWANT
Date: 2024.03.31 13:29:47 +05'30'

**( भगवान सावंत )**
**उप सचिव (वने), महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), म.रा.नागपूर.
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) / (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, कांदळवन कक्ष, मुंबई.
५) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
६) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/ ठाणे.
७) वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन मंत्रालय, मुंबई.
८) नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई.
९) मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
१०) मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव.
११) ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) निवडनस्ती, फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.